**केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण योजनेंतर्गत सन २०२२-२३ च्या राज्यशासनाच्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना जानेवारी, २०२३ ते मार्च, २०२३ या कालावधीतील मोबदला रु.१७४४.०० लक्ष इतकी रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बियुडी -१३२२/प्र.क्र.१९/२२/आरोग्य-७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ३१ मार्च, २०२३

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३,दि.१२.०१.२०२३ व दि.१६.०३.२०२३
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पूरक-२०२२/प्र.क्र.६६/अर्थ-३, दिनांक २९.०८.२०२२.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.बियुडी-१३२२/प्र.क्र.१९/२२/आरोग्य-७, दिनांक ३०.०६.२०२२.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.बियुडी-१३२२/प्र.क्र.१९/२२/आरोग्य-७, दिनांक १९.०९.२०२२.
५) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.बियुडी-१३२२/प्र.क्र.१९/२२/आरोग्य-७, दिनांक ०६.१२.२०२२
६) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.बियुडी-१३२२/प्र.क्र.१९/२२/आरोग्य-७, दिनांक १३.०३.२०२३
७) सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआअ/नियतव्यय मागणी/२०२३-२४/१५९८६९-७२/२०२३, दिनांक १६.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रमांतर्गत राज्यात आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक कार्यरत आहेत. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना, निकष व दराप्रमाणे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत प्रकल्प अंमलबजावणी आराखडयात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना राष्ट्रीय आरोग्य अभियानात नेमून दिलेल्या एकूण ५६ सेवा केल्यास त्या सेवेस

केंद्र शासनाने निर्धारित केल्याप्रमाणे प्रोत्साहनात्मक मोबदला दिला जातो. तथापि, राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रम व इतर राष्ट्रीय आरोग्य विषयक कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक हया दोन्ही घटकांच्या भूमिका महत्वाच्या असल्यामुळे सदर कामांकरीता त्यांना दिनांक १७ जुलै, २०२० व ०९ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रत्येकी रु.३५००/- व ४७००/- इतका वाढीव मोबदला देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु. ३००००.०० लक्ष इतके अनुदान राज्य शासनाकडून मंजूर झाले असून एप्रिल २०२२ ते जून, २०२२ या ३ महिन्याचे रु.८०७२.३१९ लक्ष व सन २०२१-२२ मधील प्रलंबित असलेले रु. १३९.०० लक्ष असे एकूण रु. ८२११.३२ लक्ष इतक्या रकमेच्या वितरणास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आलेली आहे. तसेच माहे, जुलै ते सप्टेंबर, २०२२ या तीन महिन्यांच्या कालावधीतील रु.८०७२.३१९ लक्ष इतक्या रकमेच्या वितरणास संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. तसेच ऑक्टोंबर, २०२२ ते डिसेंबर, २०२२ या तीनच्या महिन्याच्या कालावधीतील रु.८०७२.३२ लक्ष इतक्या रकमेच्या वितरणास संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आलेली आहे. तसेच संदर्भ क्र.६ आता जाने २०२३ ते मार्च २०२३ या तीन महिन्याचा मोबदला अदा करण्यासाठी रु.६२७०.७६ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे. तसेच उर्वरीत रु.१७४४.०० लक्ष इतका निधी माहे जानेवारी ते मार्च-२०२३ या कालावधीसाठी वितरीत करण्यास वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. त्यानुषंगाने वित्त विभागाने निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. वित्त विभागाने रु.१७४४.०० लक्ष इतके अनुदान वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यामुळे रु.१७४४.०० लक्ष इतके अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना मोबदला अदा करण्यासाठी सन २०२२-२३ मध्ये रु. ३००००.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पिय तरतूद तसेच माहे डिसेंबरच्या हिवाळी अधिवेशनामध्ये रु.२३७०.७६ लक्ष इतका निधी पुरवणी मागणीद्वारे असा एकूण रु.३२३७०.७६ लक्ष इतका निधी राज्यशासनाने अर्थसंकल्पीत केलेला आहे. सदर तरतुदीतून आशा स्वयंसेविका व आशा गटप्रवर्तक यांना जानेवारी, २०२३ ते मार्च, २०२३ या ३ महिन्याच्या कालावधीची रक्कम रु.६२७०.७६ लक्ष इतकी रक्कम वितरीत केलेली आहे. आता माहे जानेवारी ते मार्च-२०२३ या कालावधीसाठी उर्वरीत शिल्लक निधी रु.१७४४.०० लक्ष इतका निधी लेखाशिर्ष २२१०H०१५ मधून वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | (रु.लाखात) | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतुद + पुरवणी मागणी सन २०२२-२३ | मागणी रक्कम (राज्य हिस्सा) |
| १ | आर-१,<br>२२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य;<br>१०१-रोग प्रतिबंध आणि नियंत्रण<br>०२-किमान गरजा कार्यक्रम<br>(०२) (०१) आशा स्वयंसेविका व आशा गटप्रवर्तक यांना प्रोत्साहन (कार्यक्रम)<br>३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०H०१५ | ३२३७०.७६ | १७४४.०० |

४. वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/ विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

५. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत.

६. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

७. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅंक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहेत.

८. सदर अनुदान सशर्त असुन वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

९. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१०. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४४/१४७२, दिनांक १४.०२.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १७३/व्यय-१३ दिनांक २२.०३.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३०१२१६१०२८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2023.03.31 18:49:26 +05'30'

**(राजेंद्र वि. कुडले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग(का-१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग ( अर्थसंकल्प)/व्यय-१३, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२. निवडनस्ती ( आरोग्य -७) .